उप अभियंता (स्थापत्य) यांची
बदली /पदस्थापना

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१७/प्र.क्र.६/सेवा-२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७.०१.२०१७

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव तसेच लोकप्रतिनिधींकडून प्राप्त झालेल्या शिफारशी व वैयक्तीक विनंतीनुसार श्री.लियाकत अकबर काझी, उप अभियंता, जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) यांची बदली जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) येथून श्री.पी.सी.उजागरे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या सा.बां.उप विभाग, जामखेड या पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री.काझी यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून, आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रूजू होण्यास सांगावे.

३. श्री.काझी यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये. अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणिव संबंधीतांना करून देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यंनी नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास कळवावा. विहीत कालावधीत अधिकारी रूजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरूध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से (रजा) नियम,१९८१ मधील नियम-३०(सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचा रजा अर्ज स्वीकारु नये/मंजूर करू नये.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०७१७२१५०९२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.01.09 15:16:20 +05'30'

**(अ.ज.कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक
३. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
४. श्री.लियाकत अकबर काझी, उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग,नाशिक यांचे मार्फत.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री, (सा.बां.) ( सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा. मंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम)/
६. मा. राज्यमंत्री, (सा.बां.) ( सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा.राज्यमंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सा.बां.वि) / सचिव (बांधकामे/रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.